**केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) मान्यता प्राप्त बुलडाणा जिल्ह्यातील चिखली, खामगांव व शेगाव गटातील मान्यता प्राप्त विकासकामांच्या अंमलबजावणीसाठी केंद्र-राज्य हिश्यांतर्गत मंजूर उर्वरित अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१४ /प्र.क्र.१४१/का.०७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - १९/०५/२०२०

<u>संदर्भ:-</u>

**(१)** अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(४)/२०१३-PP, दि.२७/२/२०१६.

**(२)** अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांच्या १०६ व्या बैठकीचे इतिवृत्त दि.१४/१२/२०१५.

**(३)** अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांच्या १११ व्या बैठकीचे इतिवृत्त दि.२६/०२/२०१६.

**(४)** शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग,क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.१४१,दि.३१/०३/२०१६.

**(५)** शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग,क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.१४१,दि.३०/०४/२०१६.

**(६)**जिल्हाधिकारी,बुलडाणा यांचे पत्र क्र.कावि/अ.का./अल्पसंख्याक कक्ष/१२८/२०१९, दि.०१/०६/२०१९.

(७) अल्पसंख्याक विकास विभाग शासन पत्र क्र. अ.वि.वि.-२०१७/प्र.क्र.१४१/का-७, दि.१९/०६/२०१९

**(८)** अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/२९/२०१९ MsDP-MOMA,दि.२२/०८/२०१९.

**(९)** जिल्हाधिकारी,बुलडाणा यांचे पत्र क्र.कावि/अ.का./अल्पसंख्याक कक्ष/२३०/२०१९, दि.१८/११/२०१९.

**(१०)** अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/२९/२०१९ MsDP-MOMA,दि.२७/०२/२०२०.

<u>प्रस्तावना :-</u>

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१४/१२/२०१५ व २६/०२/२०१६ रोजी झालेल्या अनुक्रमे १०६ व १११ व्या बैठकीत बुलडाणा जिल्ह्यातील शेगांव,खामग़ांव,बुलडाणा व चिखली गटातील शैक्षणिक विषयक ( अतिरिक्त वर्गखोली आणि विज्ञान कक्षाचे बांधकाम करणे ) या बांधकामासाठी एकूण रु.५१२.६९५ लाख इतक्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. (१) येथील आदेशाद्वारे MsDP अंतर्गत विषयांकित गटातील मान्यताप्राप्त विकासकामांच्या अंमलबजावणीसाठी मंजूर केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु. ३०७.६१५ लाख इतकी रक्कम तसेच संदर्भ क्र. (४) अन्वये राज्य हिश्श्यातील रु.२०५.०८ लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना मंजूर करुन वितरित करण्यात आली आहे.

२. आता संदर्भ क्र. (९) येथील पत्रातील विनंतीस अनुसरुन, केंद्र शासनाकडून संदर्भ क्र. (१०) येथील पत्रान्वये मंजूर करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील दुस-या टप्प्यातील रक्कम **बुलडाणा जिल्ह्यातील शेगांव,खामग़ांव,बुलडाणा** व **चिखली** गटातील शैक्षणिक विषयक ( अतिरिक्त वर्ग खोली बांधकाम,संगणक कक्ष, बांधकाम, स्वच्छता गृह आणि विज्ञान कक्षाचे बांधकाम करणे ) बांधकामासाठी जिल्हाधिकारी,बुलडाणा यांना दुस-या टप्प्यातील निधी मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

३. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाकडून संदर्भ क्र. (१०) येथील पत्रान्वये बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) केंद्र हिश्श्यातील उर्वरित रु.३०७.६१५ लाख तसेच राज्य हिश्श्यातील उर्वरित रु.२०५.०८ लाख इतकी रक्कम बुलडाणा जिल्हयातील शेगांव,खामगांव, बुलडाणा व चिखली गटातील खालील तक्त्यात नमूद विकास कामांसाठी विषयांकीत बांधकामांसाठी मंजूर करण्यात आली आहे. सदरील कामासाठी केंद्र + राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सदरहू रक्कम जिल्हाधिकारी बुलडाणा यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.(८) व (९) प्रमाणे मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रू.लाखात)

| अ.क्र. | गट | कामाचे नाव | प्रकल्प किंमत | प्रकल्प संख्या | निधी मागणी करण्यात आलेले प्रकल्प | रद्द प्रकल्प | वितरित पहिला हप्ता | | वितरित करावयाचा दुसरा हप्ता | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य |
| १ | २ | ३ | ४ | ५ | | | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | शेगांव | अतिरिक्त वर्ग खोली | ६.६० | ०७ | - | - | १३.८६ | ९.२४ | दुसरा हप्ता वितरित | |
| | | संगणक कक्ष | ६.६० | २१ | १३ | ०८ | ४१.५८ | २७.७२ | २५.७४ | १७.१६ |
| | | विज्ञान कक्ष | ६.६० | ०५ | ०४ | ०१ | ९.९० | ६.६० | ७.९२ | ५.२८ |
| | | स्वच्छता गृह | १.३५ | ०६ | ०५ | ०१ | २.४३ | १.६२ | २.०२५ | १.३५ |
| २ | चिखली | अतिरिक्त वर्ग खोली (जि.प.) | ६.६० | १६ | - | - | ३१.६८ | २१.१२ | दुसरा हप्ता वितरित | |
| | | अतिरिक्त वर्ग खोली (उ.मा.) | ६.६० | ०२ | - | - | ३.९६ | २.६४ | दुसरा हप्ता वितरित | |
| | | अतिरिक्त वर्ग खोली (उ.मा.) | १२.०० | ०२ | - | - | ७.२० | ४.८० | दुसरा हप्ता वितरित | |
| | | स्वच्छता गृह | १.३५ | १३ | १० | ०३ | ५.२६ | ३.५१ | ४.०५ | २.७ |
| ३ | बुलडाणा | अतिरीक्त वर्ग खोल्या | ६.६० | ४३ | ४० | ०३ | ८५.१४ | ५६.७६ | ७९.२० | ५२.८० |
| | | स्वच्छता गृह | १.३५ | ३८ | ३५ | ०३ | १५.३९ | १०.२६ | १४.१७५ | ९.४५ |
| ४ | खामगांव | अतिरिक्त वर्ग खोली | ६.६० | २३ | १९ | ०४ | ४५.५४ | ३०.३६ | ३७.६२ | २५.०८ |
| | | संगणक कक्ष | ६.६० | १४ | १० | ०४ | २७.७२ | १८.४८ | १९.८० | १३.२० |
| | | विज्ञान कक्ष | ६.६० | ६ | - | - | ११.८८ | ७.९२ | दुसरा हप्ता वितरित | |
| | | स्वच्छता गृह | १.३५ | १५ | ११ | ०४ | ६.०७५ | ४.०५ | ४.४५५ | २.९७ |
| | | **एकूण** | | **२११** | **१४७** | **३१** | **३०७.६१५** | **२०५.०८** | **१९४.९८५** | **१२९.९९** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(८) प्रमाणे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील शेगांव,खामगांव,बुलडाणा व चिखली गटातील विकासकामांसाठी केंद्र हिश्यातील उर्वरित रु.१९४.९८५ लाख तसेच स्तंभ क्र.(९) प्रमाणे राज्य हिश्श्यातील रु.१२९.९९ लाख एवढी उर्वरित रक्कम

जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०२०-२१ या वर्षात जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(८) व (९) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत विषयांकित शैक्षणिक विषयक ( अतिरिक्त वर्ग खोली बांधकाम,संगणक कक्ष, बांधकाम, स्वच्छता गृह आणि विज्ञान कक्षाचे बांधकाम करणे ) बांधकाम करणे या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.वितरित रक्कम कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य कामांसाठी वळवून खर्च करता येणार नाही. उपरोक्त विकासकामांना दुबार निधीचे वितरण होत नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी.

६. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनांनुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

७. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत शैक्षणिक विषयक (अतिरिक्त वर्ग खोली बांधकाम बांधकाम आणि विज्ञान कक्षाचे बांधकाम करणे ) बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत बांधकामाची माहिती वेळोवेळी upload करावी.

९. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी शैक्षणिक विषयक ( अतिरिक्त वर्ग खोली बांधकाम,संगणक कक्ष, बांधकाम, स्वच्छता गृह आणि विज्ञान कक्षाचे बांधकाम करणे ) या बांधकामासाठी निधी मागणीच्या प्रस्तावासोबत वरीलप्रमाणे विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

१०. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (केंद्र हिस्सा) (२२३५- ए ५४३) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली व राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (राज्य हिस्सा) (२२३५-ए २३१ ) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ आर्थिक वर्षात उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १६/०४/२०२० अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००५२११५५४३२०४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.05.21 16:00:25 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे),मंत्रालय,मुंबई.
२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय,मुंबई.
३. नियोजन विभाग (कार्या.१४७५) मंत्रालय,मुंबई.
४. विभागीय आयुक्त,अमरावती.
५. जिल्हाधिकारी,**बुलडाणा.**
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,बुलडाणा.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर.
९. सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नविन प्रशासकीय भवन,५ वा मजला,मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा बुलडाणा.
११. निवडनस्ती,(का.७).